सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद,
या कार्यालयातील पदे स्थायी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एसपीआय २०१३/(प्र.क्र.४६०/१३)/का-२८

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १२ फेब्रुवारी, २०१५

**वाचा** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसपीआय-२००३/५४६/प्र.क्र.१०६/ २००३/ २८, दिनांक ६.८.२००४.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दिनांक २१ जून २००६.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसपीआय-२०११/प्र.क्र.२०/२८, दिनांक ६.८.२०११.

४) सेनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद संस्थेचे पत्र क्र. १००२/एसपीआय-१/३१४ दिनांक ३.१२.२०१३ व पत्र क्र.१००२/एसपीआय-१, दि.१३/०१/२०१५.

**प्रस्तावना :-**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेण्यात आलेला असून शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसपीआय-२००३/५४६/प्र.क्र.१०६/२००३/२८, दिनांक ०६/०८/२००४ अन्वये २४ पदांचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - टीईपी-२००२/ प्र.क्र.१३/ सेवा-३, दिनांक २१-६-२००६ मधील तरतुदीनुसार एकूण २४ पदांपैकी ८०% म्हणजे १९ पदे स्थायी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. या अनुषंगाने खालील बाबींची पडताळणी करण्यात आली.

अ) सैनिकी सेवापूर्व शिक्षणसंस्था, औरंगाबाद या कार्यालयातील पदांचा आढावा घेण्यात आला असून पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे.

ब) सोबतच्या परिशिष्टातील १९ पदे कायम स्वरुपाच्या दिर्घकाळ चालू राहणाऱ्या कामासाठी आवश्यक आहेत.

क) सदर पदे ३ वर्षांपेक्षा जास्त कालावधीकरीता अस्तित्वात आहेत.

उक्त नमूद पार्श्वभूमीवर खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण होऊन या कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतिबंधानुसार व वित्त विभागाच्या दिनांक २१/०६/२००६ च्या शासन निर्णयानुसार सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयातील एकूण २४ (चोवीस) पदांपैकी खालील नमूद १९ (एकोणीस) पदे दिनांक ०५/०५/२०१४ पासून पूर्वलक्षी प्रभावाने स्थायी करण्यात येत आहेत :

| अ. क्र. | पदनाम | पदांची संख्या | ज्या शासन निर्णयान्वये पद निर्माण केले त्याचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | संचालक | १ | शा. नि. क्र.एसपीआय-२०७६/ ७८९०/ २८, दि.१७/०१/१९७७ |
| २. | अधिक्षक-नि-लेखापाल | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१४७६/१८/२०-अ, दि.०५/०४/१९७७ |
| ३. | गृहरक्षक | १ | शा. नि. क्र.एसपीआय-११७७/२४९१/२०-अ, दि.११/०७/१९७८ |
| ४. | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१४७६/१८/२०-अ, दि.०५/०४/१९७७ |
| ५. | लेखा लिपिक | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१४७६/१८/२०-अ, दि.०५/०४/१९७७ व शा. नि. क्र.एसपीआय-१०८४/ ३६९०/ सीआर-४५१/८४/२८, दि.२५/०२/१९८५ |
| ६. | वरिष्ठ लिपिक | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ |
| ७. | लिपिक - नि-टंकलेखक | २ | शा. नि. क्र.एसपीआय-११७७/२४९९/२०-अ, दि.११/०७/१९७८ |
| ८. | शारिरीक प्रशिक्षण निदेशक | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ |
| ९. | वाहन चालक | १ | शा. नि. क्र.एसपीआय-११७७/२४९१/२०-अ, दि.०८/०९/१९७७ |
| १०. | सुतार | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१०८४/ ४५६३/ १४/ ८५/ २८, दि.२०/०५/१९८५ |
| ११. | शिपाई | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१४७६/१८/२०-अ, दि.०५/०४/१९७७ व शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/ ७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ |
| १२. | पहारेकरी | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ व शा. नि. क्र.एसपीआय-१०८४/ ४५६३/ १४८५/२८, दि.२०/०५/१९८५ |
| १३. | स्वयंपाकी | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ व शा. नि. क्र.सैसंस-१०९०/ प्र.क्र.०७/ ९०/२८, दि.०१/०९/१९९० |
| १४. | मसालची | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ |
| १५. | सफाईगार | १ | शा. नि. क्र.एसएसबी-२०७६/७८९०/२८, दि.१७/०१/१९७७ व शा. नि. क्र.एसपीआय-१०८४/ ४५६३/ १४/८५/२८, दि.२०/०५/१९८५ |

| अ. क्र. | पदनाम | पदांची संख्या | ज्या शासन निर्णयान्वये पद निर्माण केले त्याचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १६. | सफाईगार-नि-पहारेकरी | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१०७८/११९/२०-अ, दि.२९/०९/१९७८ |
| १७. | ग्राउंडसमन | १ | शा. नि. क्र.एसपीआय-१०८४/४५६३/१४/८५/२८, दि.२०/०५/१९८५ |
| १८. | माळी | १ | शा. नि. क्र.सैसंस-१०९०/प्र.क्र.०७/९०/२८, दि.०१/०९/१९९० |
| | **एकूण पदे** | १९ | |

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. टीईपी-२२०२/प्र.क्र.१३/सेवा-३, दिनांक २१-६-२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सादर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०२१३१५४८४३६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.02.13 16:00:57 +05'30'

**(प्र.ल.दराडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको एन-१२, सेक्टर -३, मौलाना आझाद कॉलेजच्या मागे, नविन औरंगाबद - ४३१ ००३.
२) महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) महालेखापाल - २ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) वित्त विभाग/सेवा-३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७) निवड नस्ती (२ प्रती)